**जिल्हा न्यायाधीश- १ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, नाशिकरोड, जि.नाशिक यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीडीओ ०३२५/२१६/प्र.क्र.४४ /कार्यासन-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०७ मार्च, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय,विधि व न्याय विभाग क्रमांक:-न्यास्थाप -०२२४/प्र.क्र.५३/कार्यासन-११, दि.११.१०.२०२४.
२) शासन अधिसूचना विधि व न्याय विभाग क्रमांक:- न्यास्थाप-०२२४/प्र.क्र.५३/कार्यासन-११, दि.११.०२.२०२५.
३) जिल्हा व सत्र न्यायालय,नाशिक यांचे पत्र जा.क्र.वित्त/डिडीओ/१३८१/२०२५, दि.१७.०२.२०२५

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दिनांक ११.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये नाशिकरोड, जि.नाशिक येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दिनांक ११.०२.२०२५ रोजीच्या अधिसूचनेन्वये दिनांक १६ फेब्रुवारी,२०२५ पासून जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, नाशिकरोड हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. संदर्भाधीन अ.क्र. ३ रोजीच्या पत्रांन्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने जिल्हा न्यायाधीश- १ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, नाशिकरोड, जि.नाशिक यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, नाशिकरोड, जि.नाशिकसाठी जिल्हा न्यायाधीश- १ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, नाशिकरोड, जि.नाशिक यांना “कार्यालय प्रमुख” तसेच “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्याकरीता त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८,दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग, १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५(३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१४५७४५५३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2025.03.07 14:59:09 +05'30'

**(हेमांगी शेट्ये)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १/२), मा.उच्च न्यायालय, मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि.नाशिक.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, नाशिकरोड, जि.नाशिक.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नाशिक.
६) उप कोषागार अधिकारी, नाशिकरोड, जि.नाशिक.
७) कक्ष अधिकारी का.२३/२०,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी, कोषा (प्रशा-५)/विनियम/व्यय-५ , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.